सन २०१८-१९ मध्ये कृषी यांत्रिकीकरण उप अभियानांतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी रु.११५.२३२३ लक्ष निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृयायों-०६१८/प्र.क्र.२०२/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२
तारीख: २४ जानेवारी, २०१९

**संदर्भ :-**

१) कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.०४१८/प्र.क्र.१५५/१४-अे, दि.२७ एप्रिल, २०१८.
२) केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.१३-८७/२०१६-M&T(I&P),दि. २५ मे,२०१८.
३) केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T(I&P),दि. १२ जून,२०१८.
४) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांकः कृयांउ-१०१७/ प्र.क्र.६४/१७/१४-अे,दि. २७ जून, २०१८
५) केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T(I&P),दि.५ जुलै,२०१८.
६) आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१८/प्र.क्र.११/कार्या-६, दि.७ जुलै, २०१८
७) कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांकः कृयायों-०८१८/प्र.क्र.२०२/१८/१४-अे,दि.१८जुलै,२०१८
८) कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक: कृयायों-०६१८/प्र.क्र.२०२/१४-अे,दि.१९ जुलै,२०१८.
९) आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१८/प्र.क्र.११/कार्या-६,दि.७ ऑगस्ट, २०१८
१०) कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांकःकृयायों-०६१८/प्र.क्र.२०२/१४-अे,दि.१४ ऑगस्ट,२०१८.
११) कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांकः पुनर्वि-२०१८/प्र.क्र.(११२(१)/१८)/२-अे,दि.१ नोव्हें, २०१८.
१२) कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांकः कृयायों-०८१८/प्र.क्र२४३/१४-अे,दि.१६ नोव्हेंबर,२०१८
१३) आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१८/प्र.क्र.११/कार्य-६,दि.२२ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना -**

राज्यात केंद्र पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण उप-अभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानांतर्गत एकूण आठ घटक असून, त्यापैकी घटक क्र.२ व ३ राज्यात राबविण्यात येत आहेत. यामध्ये केंद्र व राज्य शासनाच्या निधीच्या हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने, सन २०१८-१९ या वर्षात कृषी यांत्रिकीकरण उप अभियानांतर्गत मंजूर केलेल्या कार्यक्रमासाठी व प्रवर्गनिहाय वितरीत केलेला निधी, तसेच सन २०१७-१८ या वर्षातील अखर्चित असलेला आणि सन २०१८-१९ या वर्षात खर्च करण्यासाठी पुनर्जिवित करुन दिलेला निधी व केंद्र हिश्श्याच्या या निधीच्या समरुप राज्य हिश्श्याच्या आवश्यक निधीचा तपशील खालील प्रमाणे आहे.

**(रु.लाखात)**

| अ. क्र. | प्रवर्ग | केंद्र हिश्श्याचा प्राप्त निधी | | | | समरुप राज्य हिस्स्याचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| | | आकांक्षित जिल्हयांसाठी | सर्व जिल्ह्यांसाठी | २०१७-१८ चा पुनर्जिवित निधी | एकूण | |
| १. | सर्वसाधारण | ६०० | २७०० | ३.५४ | ३३०३.५४ | २२०२.३६ |
| २. | अनु.जाती | १०० | ६०० | ०.२७ | ७००.२७ | ४६६.८४ |
| ३. | अन.जमाती | १०० | ४५० | ७.१६ | ५५७.१६ | ३७१.४४ |
| | एकूण | ८०० | ३७५० | १०.९७ | ४५६०.९७ | ३०४०.६४ |

संदर्भाधीन दिनांक १२ जून, २०१८ च्या पत्रान्वये केंद्र शासनाने आकांक्षित जिल्हयासाठी वितरीत केलेला अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा रु.१०० लक्ष व समरुप राज्य हिस्सा रु.६६.६७ लक्ष असा एकूण रु.१६६.६७ लक्ष निधी संदर्भाधीन दिनांक १९ जुलै, २०१८ च्या शासन निर्णयान्वये, आयुक्त (कृषि) यांना वितरीत केलेला आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधीन दि. ५ जुलै, २०१८ च्या पत्रान्वये, कृषि यांत्रिकीकरण उप अभियानासाठी अनुसूचित जमाती प्रवर्गाचा वितरीत केलेल्या केंद्र हिश्श्याच्या रु.४५० लक्ष निधीपैंकी उपलब्ध निधीच्या मर्यादेत रू.३८०.८६४६ लक्ष व समरुप राज्य हिस्सा रू.२५३.९०३१ लक्ष असा एकूण रु.६३४.७६७७ लक्ष निधी संदर्भाधीन दि.१४ ऑगस्ट,२०१८ च्या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषी) यांना वितरीत करण्यात आला आहे. केंद्र हिश्श्याचा आणखी रु.६९.१३५४ लक्ष व समरुप राज्य हिस्सा रु.४६.०९६९ लक्ष असा एकूण रु.११५.२३२३ लक्ष निधी वितरीत करणे बाकी आहे. सदर निधी सन २०१८-१९ च्या नियमित कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी आयुक्त (कृषी) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

१. सन २०१८-१९ या वर्षात अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी कृषि यांत्रिकीकरण उप अभियानांतर्गत अंमलबजावणी करण्यासाठी रु.११५.२३२३ लक्ष (रुपये एक कोटी पंधरा लक्ष तेवीस हजार दोनशे तीस फक्त) निधी आयुक्त, (कृषी) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सदर निधीमध्ये केंद्र व राज्य हिस्स्याचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

**(रु. लाखात)**

| अ. क्र. | योजनेचे नाव | अनुसूचित जमाती | | एकूण |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | |
| १. | कृषी यांत्रिकीकरण उप अभियान | ६९.१३५४ | ४६.०९६९ | ११५.२३२३ |

३. सदर खर्च खालील लेखाशीर्षखाली नोव्हेंबर,२०१८ च्या अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजुर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

| केंद्र | राज्य |
|---|---|
| मागणी क्रमांक:- टी-५<br>२४०१- पीक संवर्धन,<br>(००) (७९६)-जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (११) कृषी उन्न्ती योजना- कृषी यांत्रिकीकरण उप अभियाना (कें.पु.यो)<br>(केंद्र हिस्सा-६०%),<br>(२४०१A४५९), ३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमांक:- टी-५<br>२४०१- पीक संवर्धन,<br>(००) (७९६)-जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (१०) कृषी उन्न्ती योजना- कृषी यांत्रिकीकरण उप अभियाना (कें.पु.यो),<br>(राज्य हिस्सा-४०%),<br>(२४०१A४४१), ३३ अर्थसहाय्य |

४. सदर निधी खर्च करण्यासाठी कृषि संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, सदर निधीचे जिल्हानिकाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. या उप अभियानाकरीता वितरीत करण्यात आलेला निधी वार्षिक कृति आराखड्यात मंजुर केलेल्या वाबींबर अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी खर्ची टाकावा. तसेच, अनुदानाची रक्कम लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर PFMS प्रणालीद्वारे जमा करावी.

६. सदर निधीमधून राबवावयाच्या कार्यक्रमाची अंमलबजावणी करताना, कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना, दि.२७ एप्रिल, २०१८ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या, उन्नत शेती समृध्द शेतकरी अभियानाच्या मार्गदर्शक सूचना, केंद्र शासनाच्या दि.५ जुलै, २०१८ च्या पत्रातील सूचना, अटी व शर्तीचे तसेच दि.१८ जुलै, २०१८ च्या शासन निर्णयातील अटी/शर्ती व विहीत कार्यपद्धतीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनैपचारिक संदर्भ क्रमांक.१/२०१९/व्यय-१, दि.१५ जानेवारी,२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेस तसेच आदिवासी विकास विभागाने संदर्भाधीन दि.२२ जानेवारी, २०१९ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन व वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२ एप्रिल, २०१८ मधील अटींची पुर्तता करुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२४१७१६३०२७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2019.01.24 17:25:59 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री ( कृषि), मंत्रालय, मुंबई-३२
२. मा.राज्यमंत्री (कृषि),मंत्रालय, मुंबई-३२
३. सर्व सन्माननीय विधी मंडळ सदस्य, द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव (कृषि), मंत्रालय,मुंबई-३२
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
६. संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय,पुणे
७. सर्व संचालक/सह संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
८. विभागीय कृषि सह संचालक (सर्व)
९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१०.महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
११.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
१२.नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई-३२
१३.वित्त विभाग (व्यय-१ व अर्थसंकल्प - १३) मंत्रालय, मुंबई-३२
१४.मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
१५.मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव.
१६.निवड नस्ती (कार्यासन -४अे).